महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई व प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळे बरखास्त करण्याबाबत...

(जिल्हा निवड समिती स्थापनेबाबत.)

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक-प्रानिमं-3099/555/प्र.क्र.69-99/13-अ,
मंत्रालय, मुंबई-400 032. दिनांक :- 11 जून 1999.

संदर्भ :- 1) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-प्रानिमं-1286/प्र.क्र.86(1)/तेरा-अ, दिनांक 9.2.1988.
2) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-प्रानिमं-1095/प्र.क्र.34/95/तेरा-अ, दिनांक 10.11.1995.
3) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-प्रानिमं-3097/प्र.क्र.35/97/तेरा-अ, दिनांक 8.8.1997.
4) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-प्रानिमं-3097/प्र.क्र.35/97/तेरा-अ, दिनांक 14.10.1997.

शासन निर्णय :- शासनाने महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई तसेच सहा प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळांमार्फत गट "क" संवर्गातील पदे भरण्याची कार्यवाही बंद करण्याचा निर्णय घेतला आहे. नक्षलग्रस्त भागातील जिल्हास्तरीय गट "क" ची पदे यापूर्वीच शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-प्रानिमं-3097/प्र.क्र.35/97/तेरा-अ, दिनांक 8.8.1997 व शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-प्रानिमं-3097/प्र.क्र.35/97/तेरा-अ, दिनांक 14.10.1997 अन्वये निवड मंडळांच्या कार्यकक्षेतून वगळण्यात येऊन या पदांवर जिल्हाधिका-यांच्या अध्यक्षतेखालील समितीमार्फत निवड प्रक्रिया होत आहे.

2. त्याच धर्तीवर इतर जिल्ह्यातही जिल्हास्तरीय गट "क" ची पदे जिल्हाधिका-यांच्या समितीमार्फत भरण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. यासाठी जिल्हा स्तरावर खालीलप्रमाणे समितीची रचना करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| 1) | जिल्हाधिकारी | - अध्यक्ष. |
| 2) | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | - सदस्य. |
| 3) | जिल्हा सेवायोजन अधिकारी | - सदस्य. |
| 4) | जिल्हा समाजकल्याण अधिकारी | - सदस्य. |
| 5) | जिल्हा आदिवासी विकास अधिकारी | - सदस्य. |
| 6) | ज्या कार्यालय/विभागातील पदे भरावयाची आहेत त्या कार्यालयाचे/विभागाचे विभाग प्रमुख अथवा त्यांचे प्रतिनिधी (गट "अ" स्तराचे). | - सदस्य. |

3. महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई तसेच प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळाकडे जी मागणीपत्रे प्राप्त झालेली आहेत व ज्याबाबत अद्याप जाहिरात दिलेली नाही अशी सर्व मागणीपत्रे संबंधितांना परत करण्यात यावीत. यापुढे जिल्हास्तरीय गट "क" च्या पदांबाबत संबंधितांनी मागणीपत्रे जिल्हा निवड समितीकडे पाठवावीत.

4. जिल्हाधिका-यांच्या अध्यक्षतेखालील निवड समितीने आवश्यक वाटल्यास शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-प्रानिमं-1286/प्र.क्र.86(1)/तेरा-अ, दिनांक 9.2.1988 व शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-प्रानिमं-1095/प्र.क्र.34/95/तेरा-अ, दिनांक 10.11.1995 मध्ये विहित केलेल्या कार्यपध्दती लक्षात घेऊन आपली कार्यपध्दती आखावी.

(कृ.मा.प.

5. यापूर्वी महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई व इतर प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळानी लेखी परीक्षा घेतली असेल व मुलाखाती घेऊन निवड याद्या तयार केल्या असल्यास त्या निवड याद्यांना या आदेशांमुळे बाधा येणार नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(ना. ना. भडीकर)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

1. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई,
2. मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
3. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
4. महालेखापाल, महाराष्ट्र-1/2 (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
5. महालेखापाल, महाराष्ट्र-1/2 (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर,
6. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
7. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
* 8. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्यायशाखा, मुंबई,
* 9. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
* 10. प्रबंधक, लोक आयुक्त/उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* 11. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
* 12. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* 13. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
14. सर्व विभागीय आयुक्त,
15. सर्व जिल्हाधिकारी,
16. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
17. सर्व मंत्रालयीन विभाग,
18. सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
19. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
20. सदस्य सचिव, महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई,
21. सर्व सदस्य सचिव, प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळे,
22. निवड नस्ती.

---

* पत्राने.

---

एच-470(डी)(5000-6-99)अ.